राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवेसाठी सन २०१५-१६ करीता रु. १८.०० कोटी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.-३००११/३६७/२०१५/आ-७

गोकुळदास तेजपाल रुग्णालय, संकुल इमारत
१० वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई
दिनांक: ११ जून २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः इएमएस २०११/प्र.क्र.२२४/आरोग्य ३, दि. २८/३/२०१३
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि. १७/४/२०१५
३) शासन ज्ञापन सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र. ११८/अर्थसंकल्प, दि. ५/६/२०१५
४) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.राआसोम/एफ़एमजी/राहि/१५५७४/२०१५-१६, दि.९/६/२०१५

**प्रस्तावना :-**

अपघातानंतर अत्यवस्थ आपदग्रस्तास तातडीने वैद्यकीय सेवा देण्याच्या उद्देशाने अत्याधुनिक दळवळण यंत्रणेसह वैद्यकीय उपकरणांची सुसज्ज अशा रुग्णवाहीकांची सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या माध्यमातून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा या योजनेस उपरोक्त दि. २८/३/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेकरीता सन २०१५-१६ च्या खर्चासाठी निधी वितरीत करण्याबाबत आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांनी उपरोक्त क्र. ३) च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्यानुसार सदर कार्यक्रमासाठी चालू वर्षी मंजूर केलेल्या लेखानुदानातून आवश्यक निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा या कार्यक्रमासाठी सन २०१५-१६ च्या खर्चासाठी पहिल्या टप्यात रु. १८,००,००,०००/- (रुपये अठरा कोटी फक्त) वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावावरील निधी अटी व शर्तीच्या पुर्तता झाल्यानंतरच वितरित करण्यात यावा. सदर प्रस्तावाशी संबंधित लेखाशीर्षाखाली ३ महिन्यापूर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्या कार्यालयाने सादर केले असून या पुर्वी

वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीचे लेखा परिक्षण झालेले नसल्यामुळे लेखा परिक्षण/महालेखापाल यांचे आक्षेप उपलब्ध नाही. सदर प्रस्तावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमाच्या संबंधित लेखाशीर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र. आर- १, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ - आरोग्य सेवा, ८०० - इतर खर्च, केंद्र पुरस्कृत योजना, (१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान , ३१ सहाय्यक अनुदान (२२१० ५२४६), या मुख्य लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचे देयक त्यांनी कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि. १७/४/२०१५ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११११३५४८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.06.11 11:42:21 +05'30'

**(मनोहर ठोंबरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

५. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे.

६. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.

७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१०.नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.

११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.

१२.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.

१३.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.

१४.निवड नस्ती (आरोग्य-७).